प्रजासत्ताक दिनी नवी दिल्ली येथील पंतप्रधान रॅलीमध्ये सहभागी होणाऱ्या छात्रांकरिता आयोजित करण्यात येणाऱ्या शिबीरांकरिता मंजूर तरतुदीतून प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांक :- राछासे- २७१८/प्र.क्र.२०९/क्रीयुसे -३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ९ ऑक्टोबर, २०१८.

वाचा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८ .
२) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्र.राछासे/आरडीसी/२०१८-१९/(१४)/
का-५/४१५६, दि. २८ सप्टेंबर, २०१८.

प्रस्तावना :-

दरवर्षी नवी दिल्ली येथे होणाऱ्या प्रजासत्ताक दिनी पंतप्रधान रॅलीमध्ये महाराष्ट्रातील राष्ट्रीय छात्रसेनेतील छात्रांचे पथक सामिल होत असते. यामध्ये निवड होण्याकरिता विविध प्रकारच्या शिबीरांचे आयोजन दिल्ली येथे करण्यात येते. प्रस्तुत उपक्रमांच्या अंमलबजावणीकरिता रु.१३,४६,९२९/- इतक्या रकमेस मंजूरी देण्याबाबतची बाब या नस्तीवर विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

दरवर्षी नवी दिल्ली येथे होणाऱ्या प्रजासत्ताक दिनी पंतप्रधान रॅलीमध्ये महाराष्ट्रातील राष्ट्रीय छात्रसेनेतील छात्रांचे पथक सामिल होत असते. यामध्ये निवड होण्याकरिता विविध प्रकारच्या शिबीरांचे आयोजन दिल्ली येथे करण्यात येते. सदर शिबीरांमधून काही छात्रांची निवड करण्यात येवून, निवड झालेले छात्र प्रजासत्ताक दिनानिमित्तच्या राजपथ, नवी दिल्ली येथील पथसंचलनात सहभागी होतात. सदर शिबीरांमध्ये सहभागी होणाऱ्या युनिटकरिता होणारा खर्च रु.१३,४६,९२९/- (रुपये तेरा लक्ष शेहेचाळीस हजार नऊशे एकोणतीस फक्त ) इतक्या रकमेचा निधी वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | शिबीराचे नाव व शिबीर कालावधी | कार्यालयाचे नाव | मंजूर करावयाची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | एआयएनएससी नौ सैनिक शिबीर-१८<br>दि.१६/१०/२०१८ ते २७/१०/२०१८<br>(१२ दिवस) | समादेशक अधिकारी,<br>३ महाराष्ट्र नाविक दल, राष्ट्रीय छात्रसेना, पुणे | रु.१३,४६,९२९/- |
| | | **एकूण रक्कम** | **रु.१३,४६,९२९/-** |

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा-१०२, विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम, (०१)(०१) राष्ट्रीय छात्रसेना योजनेतर संगणक क्र. (२२०४-००१६) २१, पुरवठा व सामग्री या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि. ०२/०४/२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित कार्यालयाचे समादेशक अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर संबंधित गटप्रमुख, गटमुख्यालय यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०२/०४/२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिच्छेद ६ ते ९ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६, व ७ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००९१४४२२२७४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.10.09 14:47:19 +05'30'

( राजेंद्र पवार )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल ( लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
३. महालेखापाल ( लेखा व परीक्षा ), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
४. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना संचालनालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. सर्व विभागीय उप संचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
६. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे (संचालनालयामार्फत)
७. संबंधित वरीष्ठ कोषागार अधिकारी/जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत)
८. वित्त विभाग (व्यय-५)/ नियोजन विभाग (का. १४७१), मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. संबंधित गटप्रमुख, गटमुख्यालय, राष्ट्रीय छात्र सेना, (संचालनालयामार्फत)
११. समादेशक अधिकारी, ३ महाराष्ट्र नाविक दल, राष्ट्रीय छात्रसेना, पुणे.
१२. निवड नस्ती (क्रीयुसे-३ )